माननीय सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दि.०६ जुलै,२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करण्याबाबत.
शुध्दीपत्रक निर्गमित करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

**शासन शुध्दीपत्रक क्रमांक-न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक: १५ जानेवारी, २०२०

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक- बीसीसी२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१ डिसेंबर, २०१९.
२) आयुक्त, (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे, यांचे पत्र क्र.संकीर्ण२०१९/अ.ज.माहिती/आस्था-ब(१२३), दिनांक २४ डिसेंबर, २०१९.
३) या विभागाचे समक्रमांकाचे शासन निर्णय, दि.०४ जानेवारी, २०२०.
४) आयुक्त, (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे, यांचे पत्र क्र.संकीर्ण२०१९/आस्था-ब (१२३)/७७, दि.०६ जानेवारी, २०२०.

**प्रस्तावना -**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिकामध्ये दि. ०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने या विभागाच्या अधिपत्याखालील विभागीय शिक्षण उपसंचालक कार्यालयाच्या आस्थापनेवरील अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या गट-क मधील ११ व गट-ड मधील ३ अशी एकूण १४ अधिसंख्य पदे संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यास संदर्भ क्र.०३ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

सदर शासन निर्णयातील अ.क्र. ११ येथे नमूद श्री. रमेश महादेव राऊत, कनिष्ठ लिपीक, विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांनी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे जात पडताळणी समितीने दिलेल्या निर्णयास आव्हान दिलेले आहे. सदर याचिकेवर मा. उच्च न्यायालयाने Status-quo दिलेला असून सदरहू प्रकरण न्यायप्रविष्ठ असल्याने श्री. रमेश महादेव राऊत, कनिष्ठ लिपीक, विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांचे नाव शासन निर्णयातील विवरणपत्रातून वगळण्याबाबत संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये या विभागास विनंती केली आहे. सदर विनंतीस अनुसरुन श्री. रमेश महादेव राऊत यांचे नाव वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक -**

श्री. रमेश महादेव राऊत, कनिष्ठ लिपीक, विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांचे नाव संदर्भ क्र.३ येथील दि.४ जानेवारी, २०२० रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या सहपत्रातून वगळण्यात येत आहे. त्यामुळे गट-क मधील १० व गट-ड मधील ३ अशी एकूण १३ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत, असे वाचण्यात यावे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२००११५१७५०४८४७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUSHIL KHODWEKAR

Digitally signed by SUSHIL KHODWEKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=1c4a8f0aafeac0a009d462f7f02d23942001d76225b9f704de26731171c8684b, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=19b0ccbee5810aa5e36e9fa467a7630471d3c500ceb353fbb37bf0b6dfe0407a, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SUSHIL KHODWEKAR
Date: 2020.01.17 17:02:17 +05'30'

**( सुशिल खोडवेकर, भा.प्र.से.)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
४. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक
५. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक
६. महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
७. महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
८. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. सर्व उप शिक्षण संचालक
१२. संबंधित जिल्हा कोषागार कार्यालय,
१३. निवडनस्ती (प्रशा-५)